केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमातंर्गत (MsDP) सेलू, पाथरी व जिंतूर, जि. परभणी येथील अल्पसंख्यांक समाजातील मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेच्या प्रत्येकी ०१ प्रमाणे एकूण ०३ वसतीगृह बांधकामाकरिता तसेच हिंगोली व कळमनुरी, जि.हिंगोली येथील अल्पसंख्यांक समाजातील मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेच्या प्रत्येकी ०१ प्रमाणे एकूण ०२ वसतीगृह बांधकामाकरिता केंद्र हिश्श्यातील उर्वरित ५०% अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१२ /प्र.क्र.१३७ (भाग-१)/का.०७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - ४/११/२०१५

**संदर्भ:** - (१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०१२/प्र.क्र.१३७/का.७, दि.२८ मार्च, २०१३ व दि. २९ मार्च, २०१३,

(२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.१३७ (भाग-१)/का-७, दि.०७/०५/२०१५,

(३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.१३७ /का-७, दि.१४/०९/२०१५,

(४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१२/प्र.क्र.१३७ /का-७, दि.१४/०९/२०१५,

(५) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०१५/अल्पसंख्याक/सामान्य/कावि-२००, दि.३१/०१/२०१५ व ०६/०७/२०१५,

(६) जिल्हाधिकारी, हिंगोली यांचे पत्र क्र.नियोजन/अल्प.वसती/२०१५/कावि-५०७, दि. ०१/०५/२०१५ व दि.११.०६.२०१५

(७) अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(४)/२००८-PP, दि.२१/०९/२०१५,

(८) अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(३)/२००८-PP, दि.२६/०९/२०१५,

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठित शक्तिप्रदान समितीने दि १३/१२/२०१२ रोजीच्या ६२ व्या बैठकीत परभणी जिल्हयात सेलू, पाथरी व जिंतूर येथे मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०३ वसतीगृह इमारत बांधकामाच्या एकूण रु.९३०.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास त्याचप्रमाणे हिंगोली जिल्हयात हिंगोली व कळमनुरी येथे मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी ०१ याप्रमाणे एकूण ०२ वसतीगृह इमारत बांधकामाच्या एकूण रु.६२०.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयाद्वारे विषयांकीत वसतीगृह

बांधकामासाठी केंद्र हिश्श्यातील ५०% म्हणजेच रु. ४६५.०० लाख इतकी रक्कम पहिल्या टप्प्यात जिल्हाधिकारी, परभणी यांना तसेच रु.१५५.०० लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्यात आली आहे. संदर्भ क्र. (२) व (३) येथील शासन निर्णयांन्वये परभणी जिल्हयातील विषयांकित ०३ वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास त्याचप्रमाणे हिंगोली जिल्हयातील विषयांकित ०२ वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये हिंगोली जिल्हयातील विषयांकीत ०२ वसतीगृह बांधकामासाठी राज्य हिश्श्यातील ५०% म्हणजेच रु. १५५.०० लक्ष इतक्या रकमेपैकी रु. ११२.१० लक्ष इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना मंजूर करुन वितरित करण्यात आली आहे. आता संदर्भ क्र. (५) व (६) येथील पत्रातील विनंतीस अनुसरुन, केंद्र शासनाकडून संदर्भ क्र. (७) व (८) येथील पत्रान्वये मंजूर करण्यात आलेली केंद्र हिश्श्यातील उर्वरित ५०% रक्कम परभणी व हिंगोली येथील विषयांकीत वसतीगृह बांधकामासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाकडून संदर्भ क्र. (७) व (८) येथील पत्रान्वये केंद्र हिश्श्यातील उर्वरित ५०% म्हणजेच रु.४६५.०० लक्ष व रु.१५५.०० लक्ष इतकी रक्कम अनुक्रमे परभणी व हिंगोली जिल्हयातील विषयांकीत वसतीगृह बांधकामासाठी मंजूर करण्यात आली आहे. सदरहू रक्कम जिल्हाधिकारी, परभणी व जिल्हाधिकारी, हिंगोली यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र. (११) प्रमाणे मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(Rs. lakhs)

| Sr. No. | Name of District/ Location | Sharing Pattern | Unit | Unit Cost | Central Share | State Share | Total Cost | 1st installment released (GOI) | 1st installment released (GOM) | 2nd installment to be released (GOI) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 |
| A | **Parbhani District** | | | | | | | | | |
| 1 | Selu | 100:00 | 01 ladies hostel | 310.00 | 310.00 | – | 310.00 | 155.00 | – | 155.00 |
| | Pathari | 100:00 | 01 ladies hostel | 310.00 | 310.00 | – | 310.00 | 155.00 | – | 155.00 |
| | Jintur | 100:00 | 01 ladies hostel | 310.00 | 310.00 | – | 310.00 | 155.00 | – | 155.00 |
| | | | **Total-** | **930.00** | **930.00** | – | **930.00** | **465.00** | -- | **465.00** |
| B | **Hingoli District** | | | | | | | | | |
| 2 | Hingoli | 50:50 | 01 boys hostel | 310.00 | 155.00 | 155.00 | 310.00 | 77.50 | 56.05 | 77.50 |
| | kalamnuri | 50:50 | 01 boys hostel | 310.00 | 155.00 | 155.00 | 310.00 | 77.50 | 56.05 | 77.50 |
| | | | **Total-** | **620.00** | **310.00** | **310.00** | **620.00** | **155.00** | **112.10** | **155.00** |

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(११) प्रमाणे सन २०१५-१६ या वर्षात बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत परभणी जिल्हयातील विषयांकित ०३ मुलींच्या वसतीगृह इमारत बांधकाम या योजनेकरिता केंद्र हिश्श्यातील उर्वरित रू. ४६५.०० लाख (रुपये चार कोटी पासष्ट लाख फक्त) एवढी रक्कम जिल्हाधिकारी, परभणी यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. तसेच हिंगोली जिल्हयातील विषयांकित ०२ मुलांच्या वसतीगृह इमारत बांधकाम या योजनेकरिता केंद्र हिश्श्यातील उर्वरित रु. १५५.०० लाख (रुपये एक कोटी पंचावन फक्त) इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०१५-१६ या वर्षात जिल्हाधिकारी, परभणी व हिंगोली यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(११) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, परभणी व हिंगोली यांनी बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत विषयांकित वसतीगृह बांधणे या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम अनुक्रमे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी व हिंगोली यांना वितरित करावी.

६. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१६/०२/२०१५ रोजीच्या पत्रातील सूचनानुसार बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) वितरीत करण्यात येणा-या निधीस VAT वा कोणत्याही प्रकारचे विभागीय कर लागू राहणार नाहीत.

७. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, परभणी व हिंगोली यांनी विषयांकीत वसतीगृह इमारत बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रासह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत वसतीगृह बांधकामाची माहिती वेळोवेळी upload करावी.

९. जिल्हाधिकारी, परभणी व हिंगोली यांनी विषयांकीत वसतीगृह इमारत बांधकामासाठी निधी मागणीच्या प्रस्तावासोबत वरीलप्रमाणे विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

१०. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (केंद्र हिस्सा) (२२३५- ए ५४३) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७/०४/२०१५ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५११०५१७०८०३२५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.11.05 17:10:55 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी, परभणी व हिंगोली
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, परभणी व हिंगोली
१०. संचालक, तंत्रशिक्षण/व्यवसाय शिक्षण संचालनालय, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी व हिंगोली
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१४. निवड नस्ती, (का.७)